शासन निर्णय दिनांक १२ फेब्रुवारी, २००४ मधील तरतूदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१,
**शासन परिपत्रक क्रमांकः विसआ-२०२३/प्र.क्र.८२/पंरा-४**
दिनांक: २० जून, २०२३

**शासन परिपत्रक-:**

शासन निर्णय क्र. व्हीपीएम २६०३/प्र.क्र.१५४४/पं.रा.४, दिनांक १२ फेब्रुवारी, २००४ मधील अन्य निकष तसेच स्वतंत्र ग्रामपंचायत करावयाच्या गावाची लोकसंख्या २००० असणे आवश्यक आहे. आदिवासी किंवा तांडा या भागांसाठी किंवा दोन गावात ३ कि.मी. पेक्षा जास्त अंतर असल्यास लोकसंख्या एक हजार असणे आवश्यक आहे.

सद्यस्थितीत एक हजार लोकसंख्येची व तीन कि. मी. पेक्षा जास्त अंतर असलेली गावे असूनही काही ठिकाणी ग्रामपंचायतीचे विभाजन होत नसल्याची बाब मा. लोकप्रतिनिधींनी निदर्शनास आणली आहे. याबाबत पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत:-

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आपल्या जिल्हयातील ग्रामपंचायत विभाजनाची मागणी असलेल्या ग्रामपंचायतींचा आढावा घेऊन जिल्हा परिषद स्तरावर प्राप्त झालेले व शासन निर्णय १२ फेब्रुवारी, २००४ मधील निकष पूर्ण करीत असलेले प्रस्ताव तात्काळ विभागीय आयुक्त यांचे मार्फत शासनास सादर करावेत. तसेच याबाबत जिल्हा स्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येवून असे प्रस्ताव जिल्हा परिषद स्तरावर प्रलंबित राहणार नाहीत, याची खबरदारी घेण्यात यावी. तसेच असे जिल्हा परिषदांकडून प्राप्त प्रस्ताव तपासून परिपूर्ण प्रस्ताव शासनास तातडीने सादर करण्याबाबत विभागीय आयुक्त कार्यालयाने खबरदारी घ्यावी.

सदरचे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक 202306201213436120 असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA MUNJA BHAROSE

Digitally signed by VARSHA MUNJA BHAROSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1BD844032884BBF2167BC99CD85325223ACEEF69D02BD455B7CA6972491623E0, cn=VARSHA MUNJA BHAROSE
Date: 2023.06.20 15:32:28 +05'30'

वर्षा भरोसे
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
३. विभागीय आयुक्त, सर्व
४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
५. माहिती तंत्रज्ञान कक्ष (ग्राम विकास विभाग), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
६. निवडनस्ती, कार्यासन पं.रा.-४